**राज्य योजना सन २०२४-२५**

**निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०६.२४/प्र.क्र. १२३/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- १३ जून, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष- / पी / यो / चाबाप्र / प्र.क्र.१९ / १४७ / २०२४-२५, दि. २१.०५.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ आर्थिक वर्षाकरिता निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ८०००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०२४ ला अनुसरुन सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

३. संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये सन २०२४-२५ करीता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या योजनेतंर्गत रू. १०.२७ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १ परिपत्रक विचारात घेता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन सिंधुदूर्ग व रत्नागिरी जिल्ह्यामध्ये माकड / वानर, वन्यप्राण्यांची प्रगणना करणे (डाटा संकलन) व त्यांच्या संख्येची झालेली वाढ नोंदविणे याकरीता आराख तयार करणेकरीता निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (२४०६-०७७५) या लेखाशिर्षातंर्गत **रु. १०.२७ लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

I. सदर योजनेवर होणारा खर्ची सन २०२४-२५ मध्ये मुख्य लेखाशिर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन, ११० - वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

II. संदर्भ क्रमांक २ च्या पत्रामध्ये नमूद कार्यबाबींचा सदर योजनेमध्ये समावेश होत असल्याची खातरजमा करुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निधी वितरीत करावा.

III. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची करण्यात यावा.

IV. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

V. वित्त विभागाने साहित्य व इतर खरेदीच्या अनुषंगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या प्रचलित शासन निर्णयानुसार कार्यवाही करुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निधी वितरीत करावा.

VI. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१३१६४७०३३३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.06.13 17:00:08 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक),कोल्हापूर.
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
७. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********